सक्तीचा प्रतीक्षा कालावधी कर्तव्य कालावधी
म्हणून मंजूर करणेबाबत
**श्री.श्री.पां.भांडेकर, सांख्यिकी अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : ईएसटी-१०१५/प्र.क्र.१६६/का.१४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
६ वा मजला, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२.
तारीख : ०५ ऑक्टोबर, २०१५

## शासन आदेश

श्री.श्री.पां.भांडेकर, सांख्यिकी अधिकारी हे प्रादेशिक कार्यालय, पुणे या कार्यालयात कार्यरत होते. या विभागाच्या दि.०२/०६/२०१५ च्या आदेशान्वये श्री.भांडेकर यांची बदली करण्यात येऊन त्यांची पदस्थापना सांख्यिकी अधिकारी, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण), पुणे या पदावर श्री.भी.यो.बिरादार, सांख्यिकी अधिकारी यांच्या जागी करण्यात आली. श्री.भांडेकर यांना बदलीच्या पदावर रुजू होण्यासाठी दि.०२/०७/२०१५ (म.पू.) पासून कार्यमुक्त करण्यात आले.

२. श्री.भी.यो.बिरादार, सांख्यिकी अधिकारी यांना शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण), पुणे यांनी दि.०३/०९/२०१५ (म.नं.) पासून कार्यमुक्त केले व श्री.भांडेकर यांना दि.०४/०९/२०१५ (म.पू.) पासून रुजू करून घेतले.

३. उपरोक्त परिस्थितीमुळे श्री.श्री.पां.भांडेकर यांना दि.०२/०७/२०१५ (म.पू.) ते ०३/०९/२०१५ (म.नं.) पर्यंत पदस्थापनेशिवाय रहावे लागले. त्यामुळे त्यांचा दि.०२/०७/२०१५ (म.पू.) ते ०३/०९/२०१५ (म.नं.) हा सक्तीचा प्रतीक्षा कालावधी प्रशासकीय कारणास्तव निर्माण झाला आहे.

४. सदर सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी निर्माण होण्यास श्री.भांडेकर हे स्वत: जबाबदार नसल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९ (१४) (एफ) मधील तरतुदीनुसार, श्री.भांडेकर, सांख्यिकी अधिकारी यांचा दिनांक ०२.०७.२०१५ (म.पू.) ते ०३.०९.२०१५ (म.नं.) पर्यंतचा (या कालावधीत रजा घेतली असल्यास रजेचा कालावधी वगळून) कालावधी हा "सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी" म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

५. प्रमाणित करण्यात येते की, सदर कालावधीत श्री.भांडेकर, सांख्यिकी अधिकारी यांनी रजा उपभोगलेली नाही.

६. सदर कालावधीचे वेतन व भत्ते यावरील खर्च श्री.भांडेकर यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशिर्षाखालील सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र.सेनिवे १००१/१३०/सेवा-४, दि.२ जून, २००३ मधील परिशिष्ट-१ नुसार प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१५१००५१७२३१६१८१६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55fdd77fa8877b50fd182206f763c590c30ce698809f79d37b145fd63e375059, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2015.10.06 17:22:33 +05'30'

(प्रि.रं.छापवाले)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
३) संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण), मध्यवर्ती इमारत, पुणे-४११ ००१.
४) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, बंगला नं.८, बीएसएनएल ऑफीस शेजारी,विमानतळ रोड, येरवडा पोस्ट, येरवडा, पुणे-४११ ००६.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, पुणे.
६) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) श्री.श्री.पां.भांडेकर, सांख्यिकी अधिकारी, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण), मध्यवर्ती इमारत, पुणे-४११ ००१.
८) निवड नस्ती.